

# हेरॉल्डची सर्कस

लेखक: क्रॉकेट जॉन्सन

# हेरॉल्डची सर्कस

मराठी अनुवादः सुशील मेन्सन







एका चांदण्या रात्री, आपली स्वत:चीच परीक्षा पाहाण्यासाठी, हेरॉल्ड एका दोरीवर तोल सावरत चालण्याची कसरत लागला..









त्याने आधी खात्री करून घेतली की दोरी
अगदी घट्ट ताणून बांधलेली आहे. नाहीतर
ती हेलकावे घेऊ लागली असती.

तो दोरीवर अलगद उतरला. त्याला खूप
मजा येऊ लागली. कारण तो आता
सर्कशीतील इतरांपेक्षा खूप उंचावर होता.





त्याने घट्ट ताणून बांधलेल्या दोरीवर
बऱ्याच कसरती करून दाखवल्या.
पण शेवटी त्याचा तोल गेला.

घट्ट ताणून बांधलेल्या दोरीवरून कुणीही
सहज खाली पडू शकतो.





हेरॉल्ड गरगरत खाली पडला. त्याने हातात
जांभळा क्रेयॉन घट्ट धरून ठेवला होता.

हेरॉल्डच्या सुदैवाने त्याला खाली एक
वळणदार वक्र दिसला.



तो खाली एका हत्तीच्या सोंडेवर जाऊन स्थिरावला.



ही खूपच कठीण कसरत आहे, त्याच्या मनात आले. मग त्याने हत्तीला बक्षीस म्हणून खायला एक शेंगदाणा दिला.





हत्ती हा उंच प्राणी असतो. हेरॉल्ड
जमिनीपासून अजूनही उंचावर होता.



मग त्याने हत्तीच्या सोंडेवरून उडी
मारली आणि एका छोट्या प्राण्याच्या
गळ्याला जाऊन लटकू लागला.



तो प्राणी होता, सर्कशीतील एक रुबाबदार घोडा. त्याला उत्तम प्रशिक्षण दिलेले होते. त्यामुळे हेरॉल्ड घोड्याला सहजपणे दौडवू शकला.



हेरॉल्ड खोगीराशिवायच घोड्यावर स्वार झाला. त्याने लोकांना काही उत्कृष्ट कसरती करून दाखवल्या.







शेवटी त्याने घोड्याच्या पाठीवरून
दिमाखदार उडी घेतली.

पण त्यात तो थोडासा चुकला. खाली पडतापडता
त्याने गोल फिरून एक मजेशीर कोलांटीउडी मारली.



कुणी आपल्यावर हसण्याच्या आधीच हेरॉल्डने असे दाखवले की तो जणू विदुषकी चाळे करत आहे.



त्याने लगेच विदुषकाची टोपी आपल्या डोक्यावर ठेवली.



तो विदुषकासारखे स्मित करू लागला आणि
विदुषकासारखा बावळट वागू लागला.



शेवटी त्याने डोक्यावरची टोपी
हातात घेऊन पुन्हा स्मित केले.



त्याने हातातील टोपी विदुषकाला परत केली.



खरा विदुषक तर खूपच मजेदार होता. त्याचे खेळ बघून हेरॉल्डची हसूनहसून पुरेवाट झाली.



इतकी छान सर्कस आयुष्यात कधी पाहायला मिळाली नाही, हेरॉल्डच्या मनात आले.



सगळ्या सर्कशींमध्ये असते तशी एक जाडजूड बाई या सर्कशीतसुद्धा होती.



ती काहीतरीच जाडजूड होती.

सर्कशीत एक अतिउंच मनुष्यदेखील होता.

तो मनुष्य फारच उंच होता.

त्याच्या शेजारी एक अत्यंत ठेंगू मनुष्य उभा होता.

सर्कशीत आणखी एक मनुष्य होता, लिंबूपाणीवाला.



त्याच्याकडे लिंबूपाण्याचे एक भलेमोठे पिंप होते.



हेरॉल्डने ग्लासात लिंबूपाणी घेतले आणि ते स्ट्रॉने पिले. मग त्याला खूप टवटवीत वाटू लागले.

त्याने लिंबूपाण्याचे पैसे टेबलवर ठेवले आणि तो निघाला. तोफेच्या तोंडी देत असलेल्या एका मनुष्याला शोधायला.









तोफेने उडवलेला मनुष्य कसा दिसत असेल,
याची कल्पना हेरॉल्डला नव्हती.

पण तो मनुष्य तिथे दिसला नाही.
तोफ मात्र सज्ज होती.



सर्कस कधी कुणाची वाट बघत नसते.
एकच गोष्ट करता येण्यासारखी होती.



हेरॉल्ड स्वतःच तोफेच्या
नळकांड्यात जाऊन बसला.



तो नळकांड्याच्या आतपर्यंत शिरला.



मग तोफेने हेरॉल्डला उंच आभाळात भिरकावले.



तो वेगाने अधिकाधिक वर जाऊ लागला.



तो सर्कशीच्या सर्वात वरच्या भागात पोहोचला. तिथे लोक झुल्यावर आणि रिंगवर कसरती करत होते.









हेरॉल्डने आपला हात पुढे केला.

त्याने एक लटकती रिंग घट्ट पकडली.





रिंगवर झुलत तो खूप दूरपर्यंत गेला.

मग त्याने रिंग सोडून दिली. हवेत उलटा-पालटा होत, कसरती करत तो खाली पडू लागला.





त्याला खात्री होती की खाली हत्ती
त्याला पकडायला तयारच असणार.



पुन्हा त्याला खाली एक
ओळखीची वक्र आकृती
दिसली.





तो थोड्या कष्टानेच त्यावर उतरला.
पण ती हत्तीची सोंड नव्हती.





ते तर एका सिंहाचे शेपूट होते. तो सिंह
सर्कशीतून कसाबसा पळून गेला होता.



काही धोकादायक, अघटित घडण्याआधीच हेरॉल्ड
सिंहाला पिंजऱ्यात अडकवण्याच्या कामाला लागला.

हेरॉल्ड स्वतः सिंहाच्या पिंजऱ्यात शिरला.
तिथे फक्त सिंहाच्या प्रशिक्षकाची खुर्ची होती.



मग एका शूर प्रशिक्षकासारखा तो सिंहाला सामोरा गेला.

कसलीही भिती न बाळगता हेरॉल्डने आपले तोंड सिंहाच्या जबड्यात टाकले.



त्याने आपले डोके सिंहाच्या जबड्यातून बाहेर
काढले तेव्हा त्याला जाणवले की सिंहाला
मोठेमोठे दात आहेत.

मग अचानक हेरॉल्डला
आपल्या कामगिरीचे थोडेसे
भय वाटले.









सिंहाच्या पिंजऱ्यातून बाहेर पडताना तो स्वत:शी म्हणाला, आपल्याला काय वाटतं याने काहीच फरक पडत नाही.

प्रेक्षकांना खुश करणं, हेच सर्कशीचं काम असतं.



प्रेक्षकांमधील प्रत्येकजण प्रसन्नपणे
स्मित करत होता, हे हेरॉल्डने पाहिले.

आपण इतक्या सगळ्या लोकांना आनंद दिलाय,
हे पाहून साहजिकच, हेरॉल्ड मनोमन सुखावला.



मग त्याच्या चेहऱ्यावरही स्मित
झळकले आणि तो विनम्रतेने
प्रेक्षकांपुढे झुकला.

समाप्त